**चंद्रपूर वन प्रबोधनी, चंद्रपूर येथे अस्तित्वात असलेल्या इमारतीचे नुतनीकरण व नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी श्री. ए. जे. आर्किटेक्ट अँड इंटेरियर डिझायनर्स प्रा. लि. पुणे यांची वास्तुशास्त्रज्ञ व अभियांत्रिकी सल्लागार म्हणून नेमणूक करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ६९/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २५ ऑक्टोबर, २०१६**

<u>वाचा</u> :- १. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक वनबा-२०१६/प्र.क्र. ६९/फ-९, दिनांक १३.४.२०१६

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२४(३)/वअ/५०५/२०१६-१७, दिनांक १४.९.२०१६

**<u>प्रस्तावना</u> :-**

चंद्रपूर वन प्रबोधनी, चंद्रपूर येथे अस्तित्वात असलेल्या इमारतीचे नुतनीकरण व नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी खाजगी वास्तुशास्त्रज्ञाची नेमणूकीकरीता संदर्भाधिन दिनांक १३.४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. त्यानुषंगाने शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व कार्य पध्दतीचा अवलंब करून, संचालक वन प्रबोधनी, चंद्रपूर यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली. सदर समितीने विषयानुरून बैठका घेवून, त्यामध्ये खाजगी वास्तुशास्त्रज्ञ नेमणूक करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग नियमावलीनुसार आवश्यक ती ई-निविदा प्रक्रिया अवलंबून कार्यवाही पूर्ण केली. सदर कार्यवाहीच्या कार्यवृत्तांतानुसार सदर ई-निविदा प्रक्रियामध्ये ए.जे. आर्किटेक्ट ॲन्ड इंटिरियर डिझायनर प्रा.लि. पुणे हे संकल्पना सादरीकरण गुणवत्ता व तांत्रिक निकष यामध्ये सर्व प्रथम होते. तथापि, त्यांचे मुल्य देकार ३.९८% असल्यामुळे प्रचलित कार्यपध्दतीनुसार त्यांना वाटाघाटी (Negotiation) करण्यासाठी समितीकडून बोलावण्यात आले. वाटाघाटीनंतर ए.जे. आर्किटेक्ट यांनी ३.९८% ऐवजी ३.६५% देकार (Offer) स्विकृत केला, तसे पत्र दिनांक ६.९.२०१६ रोजी दिलेले आहे. त्यानुसार ए.जे. आर्किटेक्ट ॲन्ड इंटिरियर डिझायनर प्रा.लि. पुणे यांची वास्तुशास्त्रज्ञ व अभियांत्रिकी सल्लागार म्हणून नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

चंद्रपूर वन प्रबोधनी, चंद्रपूर येथे अस्तित्वात असलेल्या इमारतीचे नुतनीकरण व नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी ए.जे. आर्किटेक्ट ॲन्ड इंटिरियर डिझायनर प्रा.लि. पुणे यांची वास्तुशास्त्रज्ञ व अभियांत्रिकी सल्लागार म्हणून नेमणूक खालील अटी व शर्तीस अनुसरुन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. चंद्रपूर वन प्रबोधनी, चंद्रपूर याकरीता आवश्यक असणाऱ्या विविध कामासाठी सुमारे रू.१००.०० कोटीपेक्षा अधिक खर्च येणार आहे. चालू वर्षात सुमारे रू. ५.०० कोटीची कामे घ्यावयाची आहेत. याबाबतचा रिक्वेस्ट फॉर प्रपोजल करारनाम्यानुसार ए.जे. आर्किटेक्ट यांनी दिलेल्या ३.६५% देकार (Offer) स्विकृतीच्या पत्राच्या अनुषंगाने मुल्य अदा केले जाईल. याकरीता आरएफपी मधील मुद्दा क्र.२.३ मध्ये नमूद केलेल्या टक्केवारीनुसार वास्तुशास्त्रज्ञास कामाचे मूल्य अदा करण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार केलेल्या Request for Proposal नुसार अदा करण्यात यावी. याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक ११.१२.१९९५ च्या परिपत्रकातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार करुन दिलेल्या Request for Proposal मधील विभागाच्या हिताच्या दृष्टीने करारनाम्यात यथायोग्य अटींची खातरजमा करुन घेण्यात यावी.
३. करारनाम्यातील कलम ६.६ नुसार शासन करारनामा रद्दबदल करण्याची कार्यवाही करेल. याकरीता If the agreement is terminated by Engineer-in-charge for cause as provided herein ही अट वगळण्यात येत आहे.
४. करारनाम्यातील कलम ६.८ मधील उपकलम (c) वगळण्यात येत आहे.
५. सदर करारनाम्याकरीता सक्षम प्राधिकारी म्हणून विविध ठिकाणी नमूद विषयासंदर्भात वेळोवेळी शासन निर्णयाद्वारे जारी करण्यात आलेले प्राधिकृत अधिकारी समजण्यात यावे.
६. करारनाम्याच्या परिशिष्ट १ मधील कामकाजाचे सविस्तर वेळापत्रक ठरविण्यात यावे. अंमलबजावणीचा कालावधी सुरुवात झाल्यापासून २४ महिन्याचा असेल.
७. परिशिष्ट १ मधील Scope of work मध्ये “The Consultant shall assist the employer in selecting the contractor for Construction of project, as deemed necessary by the employer.” अंतर्भूत करावे.

वरीलप्रमाणे बदल केल्यानुसार करारनामा ए.जे. आर्किटेक्ट ॲन्ड इंटिरियर डिझायनर प्रा.लि. पुणे यांच्याबरोबर संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधनी, चंद्रपूर यांनी करावा.

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७९/२०१६, दिनांक २४.१०.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२६१२४३३५१०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2016.10.26 12:48:26 +05'30'

**(प्रकाश महाजन)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे.
५. संचालक, चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
७. प्राचार्य, आर्किटेक्ट कॉलेज, विश्वेश्वर्या नॅशनल इन्टीटयूट ऑफ टेक्नोलॉजी, नागपूर.
८. उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
९. श्री. बी.एम.मोटघरे, वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
१०.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
११.फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)